**महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (टिआरअे) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (आयसीएस) या योजनांतर्गत मंजूर पदांवर कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्याकरिता निधी वितरीत करण्याबाबत.**

---

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.११४/११-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १२ ऑगस्ट, २०२४

**वाचा -**

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१६९/११-अे, दि.१९.१२.२०२३.
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र.पदसातत्य-२०२४/प्र.क्र.७१/११-अे, दि.२९.०२.२०२४.
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.११४/११-अे, दि. २३.०४.२०२४
४. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/सां.४५/ प्र.क्र.१०१३/BEAMS/२४-२५/१६८६७, दि.२७.०६.२०२४.
५. वित्त विभाग, शासन निर्णय , क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (टीआरअे), कृषि गणना आणि पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (आयसीएस) योजना या तीन १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत मंजूर पदांवर कार्यरत अधिकारी/ कर्मचारी यांच्या वेतनासाठी होणारा खर्च हा प्रस्तुत योजनां अंतर्गत केंद्र शासनाकडून PFMS प्रणालीद्वारे आयुक्त (कृषि) यांना प्राप्त होणा-या अनुदानातून समायोजनाने राज्य शासनाच्या लेखाशिर्षाखाली जमा करण्याच्या अटीस अधीन राहून प्रस्तुत योजनांच्या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधी मधून खर्च करण्यास संदर्भ क्रं. (१) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. संदर्भ क्रं. (३) येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (टीआरअे) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (आयसीएस) या योजनांतर्गत सर्व विभागीय कृषि सहसंचालक व आयुक्तालय स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनाकरीता टीआरअे ०१-वेतन या बाबीखाली रु.१७५.८९ लाख व आयसीएस ०१-वेतन या बाबीखाली रु. ६४.८० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे यांनी संदर्भ क्रं. (४) च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावास अनुसरून, सदरील योजनांतर्गत सर्व विभागीय कृषि सहसंचालक व आयुक्तालय स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांचे पुढील वेतन अदा करण्याच्या अनुषंगाने, टीआरअे योजनेंतर्गत ०१-वेतन या बाबीखाली रु.३७.३१ लाख इतका निधी वितरीत करण्याची तसेच आयसीएस योजनेंतर्गत ०१-वेतन या बाबीखाली रु.५२.३८ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०२४-२५ मध्ये महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (टीआरअे) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (आयसीएस) या १०० टक्के केंद्र पुरस्कृत

योजनांतर्गत सर्व विभागीय कृषि सहसंचालक व आयुक्तालय स्तरावरील अधिकारी / कर्मचारी यांच्या वेतनाकरीता महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (टिआरअे) योजनेंतर्गत ०१-वेतन या बाबीखाली रु.३७.३१ लाख इतका निधी व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्याच्या योजनेंतर्गत (आयसीएस) ०१-वेतन या बाबीखाली रु.५२.३८ लाख इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०२४-२५ मध्ये महाराष्ट्र राज्यातील प्रमुख पिकांचे क्षेत्रफळ वेळेवर कळविण्याची योजना (टीआरअे) व पिकांच्या आकडेवारीत सुधारणा करण्यांची योजना (आयसीएस) या योजनांतर्गत अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनाचा खर्च पुढील लेखाशीर्षाखालील सन २०२४-२५ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा:-

| अ.क्र. | योजनेचे नाव | लेखाशिर्ष | उद्दिष्ट |
|---|---|---|---|
| १ | (००)(०९) कृषिविषयक आकडेवारीचा वेळेवर अहवाल देणे (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (टिआरअे) | २४०१ २५६९ | ०१-वेतन |
| २ | (००)(११) पिकांच्या आकडेवारीत सुधारणा (१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना) (कार्यक्रम) (आयसीएस) | २४०१ २५७८ | ०१-वेतन |

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येणारा निधी शासन निर्णय दि.१९.१२.२०२३ मधील तरतूदी आणि शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परिपत्रके यांच्या अधिन राहुन खर्च करण्याची जबाबदारी आयुक्त (कृषि) यांची राहील.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ, आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून व आयुक्तालय स्तरावरील खर्चासाठी सहाय्यक संचालक, लेखा-१, यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, विभागीय कृषि सहसंचालक स्तरावर विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने संदर्भ क्र.(५) च्या परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१३१४२६४१७५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEETA EKNATH SHINDE

Digitally signed by NEETA EKNATH SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=f2bffd6992498e56663024368c72b33364cfb066d53682c53a425e54d187a7c1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F325D659F47933958AA2D98F394DB95F94BE57548776492BA36E77EA1C4AA53B, cn=NEETA EKNATH SHINDE
Date: 2024.08.13 14:42:16 +05'30'

**( निता शिंदे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अ.मु.स. (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
३. कृषि संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४. मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
६. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०. वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
११. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१२. उप सचिव (११-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३. कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४. कक्ष अधिकारी (१५-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१५. निवड नस्ती, का.११-अे.